वित्तीय समावेशन उपक्रमाच्या नियमित आढाव्यासाठी राज्यस्तरावर वित्तीय समावेशन समितीची (Financial Inclusion Committee) पुनर्रचना करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसएलबीसी १६१६/प्र.क्र.३१/का.१४१७**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: ०३ डिसेंबर, २०१६

वाचा : १. वित्त मंत्रालय, भारत सरकार यांचे अ.शा.पत्र क्र.१/९/२०१४-FI (Pt.XIII), दि. २९.०१.२०१६
२. शासन निर्णय, नियोजन विभाग क्रमांक: एसएलबीसी १६१६/प्र.क्र.३१/का.१४१७, दि. १३ मे, २०१६.

**प्रस्तावना:**

केंद्र शासनाने राज्य व बँकांसमवेत एकत्रितपणे वित्तीय समावेशनाबाबतची कार्यवाही हाती घेतल्याबाबत कळविले आहे. त्याबाबत त्यांनी दि. ५ व १५ डिसेंबर, २०१५ च्या पत्रान्वये रुपे डेबीट कार्ड प्रधानमंत्री मुद्रा योजना (PMMY), प्रधानमंत्री विमा योजना (अपघात विमा) (PMSBY), प्रधानमंत्री जीवन ज्योती योजना (जीवन विमा) (PMJJBY), आणि अटल पेन्शन योजना (APY) या योजनांना जोडण्याबाबत राज्य शासनास कळविले आहे. तसेच सर्वसाधारण सेवा केंद्र जसे औषधाचे दुकान, किराणा दुकान, अंगणवाडी सेवक, आशा सेवक इ. स्थानिक संस्था बँकींग प्रकियेच्या पलिकडे असल्याने त्यांना कमीत कमी वेळेत बँकींग प्रक्रियेत सहभागी करुन देण्याच्या जाणिवेवर भर देण्याची आवश्यकता नमूद केली आहे.

२. केंद्र शासनाच्या नियमित तंत्रज्ञानविषयक आढाव्यामध्ये खंडीत होणारी इंटरनेट जोडणी, तसेच काही भागामध्ये मायक्रो-एटीएमच्या समस्येचे निराकरण करण्यात आले. खंडीत इंटरनेट सेवा उपलब्ध असलेल्या दूरस्थ ठिकाणी नाबार्डच्या सहाय्याने व्हीसॅटद्वारे बँकांना कनेक्टीव्हीटी देण्यात आली आहे. बँकांच्या माध्यमातून मायक्रो-एटीम सनियंत्रित करण्यात येतात. तसेच विविध भागातील बँकांच्या व्यवहाराबाबत आढावा घेण्यात येतो.

३. सर्व भागात बँकींग सेवा पोहोचण्यासाठी स्थानिकांचा सहभाग व नियंत्रण आवश्यक आहे. राज्य व केंद्र शासनाच्या विविध यंत्रणांच्या माध्यमातून ऐच्छिक आधार लिंक्ड जन धन योजनेचे खाते जोडणे, स्थानिक बँक प्रतिनिधींचे प्रशिक्षण आणि मोबाईल नंबरशी बँक खाते जोडणे याबाबत प्रयत्न होणे गरजेचे आहे. यासाठी, प्रत्येक राज्यातून एसएलबीसी बैठकीमध्ये भाग घेणाऱ्या नोडल अधिकाऱ्यांची निवड झालेली आहे. सदर राज्यस्तरीय नोडल अधिकारी व त्यांच्या समन्वयकांची यादी पोर्टलवर अपलोड केलेली आहे.

४. त्या अनुषंगाने वित्तीय समावेशन उपक्रमाच्या नियमित आढाव्यासाठी संदर्भाधीन शासन निर्णयान्वये राज्यस्तरावर वित्तीय समावेशन समिती गठीत करण्यात आली आहे. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखाली दि. २६ सप्टेंबर, २०१६ रोजी झालेल्या आढावा बैठकीमध्ये घेण्यात आलेल्या निर्णयानुसार सदर समितीची पुनर्रचना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

संदर्भाधीन दि. १३ मे, २०१६ रोजीचा शासन निर्णय अधिक्रमित करून राज्यस्तरीय वित्तीय समावेशन समितीची खालीलप्रमाणे पुनर्रचना करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य | - | अध्यक्ष |
| २. नोडल अधिकारी, वित्तीय सेवा विभाग, वित्त मंत्रालय, भारत सरकार | - | सदस्य |
| ३. नोडल अधिकारी, राज्यस्तरीय बँकर्स समिती, महाराष्ट्र राज्य | - | सदस्य |
| ४. मुख्य पोस्ट मास्टर जनरल, महाराष्ट्र मंडळ | - | सदस्य |
| ५. संचालक, भारतीय जीवन बीमा निगम | - | सदस्य |
| ६. शासन नियुक्त संचालक, मुद्रा | - | सदस्य |
| ७. अध्यक्ष तथा प्रबंध संचालक, स्टेट बँक ऑफ इंडिया | - | सदस्य |
| ८. अध्यक्ष तथा प्रबंध संचालक, बँक ऑफ इंडिया | - | सदस्य |
| ९. अध्यक्ष तथा प्रबंध संचालक, सेंट्रल बँक इंडिया | - | सदस्य |
| १०.मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवन्नोन्नती अभियान व राज्य मिशन संचालक | - | सदस्य सचिव |

**समितीची कार्यकक्षा:**

१) सदर समितीने स्थानिक समस्यांचा नियतकालीक आढावा नियमित घ्यावा जेणेकरुन अनेक समस्यांचे कमीत कमी कालावधीत निराकारण होईल.

२) ज्या समस्यांचे केंद्र शासन स्तरावर निराकरण करणे आवश्यक आहे अशा सूचना व अभिप्राय त्यांच्या pmjdy.gov.in या पोर्टलवर अपलोड करावयात अथवा केंद्रिय वित्त सेवा सचिव यांना थेट कळवाव्यात.

३) सदर समितीने ३ महिन्यांतून एकदा समितीची बैठक घ्यावी. याशिवाय आवश्यकतेनुसार समितीच्या बैठका आयोजित कराव्यात.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२०३१२०२४२७७१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Priyanka Ranjan Chhapwale

Digitally signed by Priyanka Ranjan Chhapwale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=55fdd77fa8877b50fd182206f763c590c30ce698809f79d37b145fd63e375059, cn=Priyanka Ranjan Chhapwale
Date: 2016.12.03 12:05:30 +05'30'

**( प्रियांका रं. छापवाले )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. राज्यपाल , महाराष्ट्र राज्य यांचे सचिव

२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

३) मा.मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव

४) मा. राज्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव

५) मा. विधानसभा / विधानपरिषद सदस्य (सर्व)

६) मा. मुख्य सचिव , महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.

७) सचिव, भारत सरकार, वित्त मंत्रालय, वित्तीय सेवा विभाग, रु.नं. ६, तिसरा मजला, जीवन दीप भवन, १०, पार्लमेंट रोड, नवी दिल्ली ११० ००१.

८) अपर मुख्य सचिव , नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

९) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव सर्व मंत्रालयीन विभाग

१०) मुख्य पोस्ट मास्टर जनरल, महाराष्ट्र मंडळ, दुसरा मजला, मुंबई जीपीओ जुनी इमारत, मुंबई-४००००१.

११) नोडल अधिकारी, वित्त विषयक सेवा, महाराष्ट्र, वित्त मंत्रालय, वित्तीय सेवा विभाग, रु.नं. ६, तिसरा मजला, जीवन दीप भवन, १०, पार्लमेंट रोड, नवी दिल्ली ११० ००१.

१२) महासंचालक, UIDAI आधार, ७ वा मजला, एमटीएनएल एक्सचेंज बिल्डिंग, जी.डी.सोमानी मार्ग, कफ परेड, मुंबई ४०० ००५.

१३) मुख्य कार्यकारी अधिकारी,महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवन्नोती अभियान (MSRLM), उमेद- MSRLM, पाचवा मजला, दक्षिण विंग, सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई ४०० ६१४.

१४) शासन नियुक्त संचालक, मुद्रा, मुद्रा बँक, SME डेव्हलपमेंट सेंटर, जी-ब्लॉक, प्लॉट नं.सी-११, वांद्रे (पूर्व), वांद्रे-कुर्ला संकुल, मुंबई ४०० .०५१

१५) संचालक, भारतीय जीवन बीमा निगम, योगक्षेमा, जीवन बीमा मार्ग, पोस्ट बॉक्स नं. १९९५३, मुंबई-४०० ०२१.

१६) नोडल अधिकारी, राज्यस्तरीय बँकर्स समिती, महाराष्ट्र, लोकमंगल, १५०१, शिवाजीनगर, पुणे ४११ ००५.

१७) अध्यक्ष तथा प्रबंध संचालक, स्टेट बँक ऑफ इंडिया,मुख्य कार्यालय, वांद्रे-कुर्ला संकुल, मुंबई - ४०० ०५१.

१८) अध्यक्ष तथा प्रबंध संचालक, बँक ऑफ इंडिया, मध्यवर्ती इमारत, शहीद भगतसिंग मार्ग, फोर्ट, मुंबई -४०० ००१.

१९) अध्यक्ष तथा प्रबंध संचालक, सेंट्रल बँक इंडिया, चंद्र मुखी, नरीमन पॉईंट, मुंबई -४०० ०२१.

२०) उप सचिव, का.१४१७, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

२१) सर्व सह सचिव /उप सचिव / अवर सचिव , नियोजन विभाग , मंत्रालय , मुंबई

२२) निवडनस्ती, कार्यासन १४१७.